# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, २०२३

---

### अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

### प्रश्नांची एकूण संख्या - २०

---

### मोखाडा (जि.पालघर) तालुक्यातील एक शिक्षकी शाळेतील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होत असल्याबाबत

**(१) ३०२२ (२८-०५-२०२०) श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.प्रसाद लाड, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मोखाडा (जि.पालघर) तालुक्यात मुख्याध्यापकासह शिक्षकांची कमतरता असून वारंवार प्रशिक्षणासाठी शाळा बंद ठेवाव्या लागत असल्याने परिणामी एक शिक्षकी शाळांची अवस्था अत्यंत बिकट झाली असून, सतत गैरहजर राहणाऱ्या शिक्षकांमुळे नियमित अध्यापनावरही परिणाम होत असल्यामुळे प्राथमिक शिक्षण हक्क कायद्याचे उल्लंघन होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मोखाडा तालुक्यात २३ मुख्याध्यापकांपैकी १६ कार्यरत असून ७ पदे रिक्त आहेत, भाषा पदवीधर शिक्षकांची ३८ पैकी १७ पदे रिक्त आहेत, विज्ञान पदवीधर शिक्षकांचे ४७ पैकी एकही पद भरण्यात आले नसुन समाजशास्त्र शिक्षकांचे २४ पैकी २२ पदे कार्यरत व २ पदे रिक्त आहेत, उपशिक्षकांची ३७३ पैकी सुमारे ५२ पदे रिक्त आहेत, या रिक्त पदाव्यतिरिक्तही मुख्याध्यापक ५, पदवीधर भाषा २, विज्ञान ६ व उपशिक्षक १५ अशी एकूण २४ अनिवार्य अतिरिक्त पदे अत्यावश्यक असून मात्र अनुशेष भरती प्रलंबित असल्याने त्याचा प्राथमिक शिक्षणावर परिणाम होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मोखाडा तालुक्यातील रिक्त पदे विनाविलंब भरण्यात यावीत, म्हणून तेथील ग्रामस्थांनी तसेच सामाजिक संस्थांनी मागील १ वर्षापासून सातत्याने मा.शालेय शिक्षण मंत्री, मा.पालकमंत्री, शिक्षण संचालक, महाराष्ट्र शासन, पुणे व शिक्षण उपसंचालक, ठाणे आदींकडे मागणी केलेली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मोखाडा तालुक्यातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये, यासाठी सदरहू रिक्त पदे भरण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) अशी वस्तुस्थिती नाही.

प्रशिक्षण कालावधीत विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये यास्तव प्रशिक्षणार्थी शिक्षकांच्या जागी पर्यायी शिक्षकांची नेमणूक करण्यात येते.

(२) व (३) होय.

(४) वित्त विभागाने ५० टक्के पदभरतीवरील बंदी उठविण्याबाबत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## माध्यमिक शाळांच्या सुधारित आकृतिबंधानंतर शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची भरती करण्याबाबत

**(२) ३४१९ (०२-०६-२०२०) श्री.किशोर दराडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माध्यमिक शाळांच्या सुधारित आकृतिबंधानंतरही अनेक वर्षापासून प्रलंबित असलेली शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची भरती करण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू शाळेतील कर्मचाऱ्यांचा मृत्यू झाल्यास त्यांच्या पाल्यांना अनुकंप तत्वाचा लाभ त्या शाळेवर किंवा जिल्ह्यामध्ये नियुक्त करण्याचे अधिकार शिक्षण अधिकारी यांना शासन देणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.

(२), (३) अनुकंपा नियुक्तीबाबतचे सुधारीत धोरण सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुकंपा तत्त्वावरील भरतीबाबत

**(३) ३४३७ (०२-०६-२०२०) श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुकंपा तत्त्वावरील भरती करण्याबाबत शिक्षक भारती आणि विविध संघटना यांनी माहे एप्रिल, २०२० मध्ये वा त्यादरम्यान मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) व (२) राज्यातील शिक्षक, शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुकंपा तत्वावरील भरती करण्याबाबतचे धोरण सुधारीत करण्याची कार्यवाही सुरू आहे. तथापि, दिनांक ३०/०७/२०२० च्या शासन निर्णयान्वये अनुकंपा तत्वावरील नेमणूका वित्त विभागाच्या पदभरतीबाबतच्या निर्बंधातून वगळण्यात आल्या आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अपंग समावेशित विशेष शिक्षकाचे समायोजन करण्याबाबत

**(४) ३८५१ (१६-०७-२०२०) श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत नियुक्त विशेष शिक्षक व परिचर यांना मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने दिनांक २५ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या निर्णयानुसार तसेच मा.मुख्यमंत्री यांनी दिनांक १२ ऑक्टोबर, २०१६ रोजी दिलेल्या आदेशानुसार अन्य शाळेत समायोजित न केल्याबाबत तसेच वेतनाची थकबाकी अदा न केल्याबाबत नागपूर विभागाच्या शिक्षक लोकप्रतिनिधींनी दिनांक २६ ऑक्टोबर, २०१९ रोजी मुख्य सचिव, अप्पर मुख्य सचिव, शिक्षण आयुक्त व शिक्षण संचालक (प्राथ/माध्य.) यांना पत्र पाठवून दोषी अधिकाऱ्यांविरूध्द कारवाई करण्याची मागणी केली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विशेष शिक्षकांच्या समायोजनाचा व थकीत नियमित वेतनाचा शासन निर्णय निर्गमित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (०२-०१-२०२३) :** (१) व (२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य यांनी १३५८ विशेष शिक्षकांच्या प्रकरणी रद्द केलेल्या मान्यता, पुनर्स्थापित करण्याचे तसेच सदर शिक्षकांच्या उपस्थितीबाबतची कागदपत्रे तपासून त्यांना वेतन अदा करण्याचे आदेश मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांनी रिट याचिका क्र. १०३०/२०१६ प्रकरणी दिनांक २५/०८/२०१६ रोजी दिले आहेत. सदर प्रकरणी सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्या अध्यक्षतेखालील चौकशी समितीच्या अहवालानुसार पुढील कार्यवाही सुरू आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील डाएटच्या ३३ संस्थांमधील कर्मचाऱ्यांना नियमितपणे मासिक वेतन अदा करण्याबाबत

**(५) ८४९२ (२०-०७-२०२१) श्री.प्रसाद लाड, श्री.गोपिचंद पडळकर, श्री.रमेश कराड :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात प्रत्येक जिल्ह्यात प्राथमिक ते माध्यमिक शिक्षणासाठी सन १९९५-१९९६ मध्ये ३३ जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था स्थापन करण्यात आल्या असून कोविड-१९ महामारीत सुमारे दीड वर्षापासून ते आतापर्यंत राज्यातील शालेय विद्यार्थ्यांचे शिक्षण विविध माध्यमाद्वारे सुरु ठेवण्यात जिल्हा शिक्षण

प्रशिक्षण संस्थांचे भरीव योगदान असून स्वाध्यायपर्यंत विविध उपक्रम ऑनलाईन सुरु करून मुलांचे शिक्षण व शिक्षकांच्या प्रशिक्षणास यशस्वीरित्या प्रोत्साहन देणाऱ्या संस्थेतील अधिकारी व कर्मचाऱ्यांना कोरोना काळात वेतनासाठी संघर्ष करावा लागत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कोविड-१९ महामारीत राज्यातील सदरहू ३३ जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्थांना (डाएट) निधी उपलब्ध होत नसल्याने संस्थांमधील राजपत्रित अधिकारी तसेच कर्मचाऱ्यांना मागील पाच महिन्यांपासून मासिक वेतन आजमितीस मिळालेले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सततच्या अनियमित व विलंबाने होणाऱ्या वेतन समस्येसंदर्भात मागील वर्षभर हे सर्व अधिकारी, कर्मचारी, शांतताप्रिय मार्गाने अर्ज, विनंत्या आंदोलने करूनही शासनाने त्याची गांभीर्याने दखल घेतलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू डाएटच्या ३३ संस्थांमधील कर्मचाऱ्यांना नियमितपणे मासिक वेतन अदा करण्याकरीता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२६-१२-२०२२) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.
(३) व (४) शासन स्तरावरुन वेळोवेळी प्रस्ताव सादर करण्यात येतो. केंद्र शासनाकडून पुरेसा व वेळेवर निधी प्राप्त होत नसल्याने निधी वितरणास विलंब होतो. त्यामुळे राज्य शासनाच्या तिजोरीतून वेतनावरील निधीची वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. सद्य:स्थितीत प्रलंबित वेतन अदा करण्यात आले आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सहाय्यक शिक्षक परिविक्षाधीन यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत

**(६) ८६८३ (२०-०७-२०२१) श्री.कपिल पाटील, श्री.किरण सरनाईक : तारांकित प्रश्न क्रमांक ७०४७ ला दिनांक ४ मार्च, २०२१ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मागील पंधराहून अधिक वर्षांपासून शिक्षण सेवक योजना सुरू असून या शिक्षकांना कमी वेतन व शासनाच्या योजनांचा कुठलाच लाभ मिळत नसल्याचे माहे मे, २०२१ च्या शेवटच्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) तसेच, राज्यात प्राथमिक शिक्षण सेवकांना रुपये ६०००/-, माध्यमिक शिक्षण सेवकांना रुपये ८०००/- व उच्च माध्यमिक शिक्षण सेवकांना रुपये ९०००/- असे मानधन शासन निर्णय, दिनांक १७/०९/२०११ अन्वये दिनांक ०१/०१/२०१२ पासून देण्यात येते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सहाय्यक शिक्षक परिविक्षाधीन (शिक्षण सेवक) कर्मचाऱ्यांना वेतनश्रेणी लागू करून सहाय्यक शिक्षक परिविक्षाधीन कालावधी कमी करण्याच्या मागणीबाबतचा प्रस्ताव तपासण्याची कार्यवाही पूर्ण झाली आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षण सेवक योजना बंद करून या शिक्षकांना वेतनश्रेणी नियुक्ती देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) अंशत: खरे आहे. शिक्षण सेवक योजना सन २००० पासून सुरु असून त्यांना प्रथम तीन वर्ष मानधन दिले जाते.
(२), (३) व (४) शिक्षण सेवक योजनेनुसार सहाय्यक शिक्षक परिविक्षाधीन (शिक्षण सेवक) यांना सद्य:स्थितीत शासन निर्णय दिनांक १७/०९/२०११ अन्वये निश्चित केलेले मानधन दिले जाते.

शिक्षण सेवक योजना बंद करुन शिक्षकांना वेतनश्रेणीद्वारे नियुक्ती देण्याबाबतची बाब शासनस्तरावर विचाराधीन नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक शहरातील 'सिल्व्हर ओक' शाळेतील व्यवस्थापनेच्या मनमानी कारभाराबाबत

**(७) ८८४७ (१५-०६-२०२१) श्री.नरेंद्र दराडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोरोनाच्या वाढत्या प्रादुर्भावामुळे राज्यातील संपूर्ण शाळा मागील वर्षभरापासून बंद असल्याने शाळेमार्फत ऑनलाईन शिक्षण दिले जात असून नाशिक शहरातील 'सिल्व्हर ओक' शाळेच्या विद्यार्थ्यांच्या पालकांनी संपूर्ण शैक्षणिक वर्षाचे शुल्क भरले असतानाही शाळा व्यवस्थापनाने यावर्षी शुल्कवाढ, सांस्कृतिक महोत्सव, क्रीडा महोत्सव यासारख्या न झालेल्या उपक्रमाच्या नावाखाली पालकांकडून अतिरिक्त शुल्क वसूलीसाठी विद्यार्थ्यांचे निकाल अडवून ठेवल्याचे माहे मार्च, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याप्रकरणी पालकांकडून शाळा व्यवस्थापनाच्या मनमानी कारभाराविरुध्द शाळेबाहेर आंदोलन करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने मनमानी पध्दतीने विद्यार्थ्यांची अडवणूक करुन पालकांकडून शुल्क आकारणी करणाऱ्या शाळा व्यवस्थापनावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१५-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) उपरोक्त प्रकरणी शाळेची चौकशी करण्यात आली आहे. तथापि, सदर प्रकरण न्यायप्रविष्ट असल्यामुळे कारवाई करण्यात आली नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## एसएससी कोड आणि खाजगी शाळा सेवा शर्ती नियमावली १९८१ याचे सुधारित प्रारुप कायदयात रुपांतर करण्याबाबत

**(८) ९४५५ (२०-०७-२०२१) श्री.जयंत आसगावकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.राजेश राठोड, श्री.अभिजित वंजारी :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) एस एससी कोड आणि खाजगी शाळा सेवा शर्ती नियमावली १९८१ याचे सुधारित प्रारुप शासनस्तरावर तयार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शिक्षकांनी एस एससी कोड आणि खाजगी शाळा सेवाशर्ती नियमावली १९८१ याचे सुधारित प्रारुप कायदयात रुपांतर करण्याबाबत मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरील मागणीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) व (२) महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) विनियमन अधिनियम १९७७ तसेच त्याअंतर्गत तयार करण्यात आलेले महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मध्ये सुधारणा करण्यास शासनास शिफारस करण्यासाठी शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय दिनांक १९/०८/२०१६ अन्वये आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीकडून उक्त अधिनियम व नियमावलीतील सुधारणांबाबतचा शिफारस अहवाल शासनास प्राप्त नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना ५० लाखाचे विमा कवच व त्यांच्या वारसांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत

**(९) ९५४१ (१५-०६-२०२१) श्री.रमेश कराड, श्री.कपिल पाटील, श्री.प्रसाद लाड, श्री.अभिजित वंजारी, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.सुधीर तांबे, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.राजेश राठोड, श्री.जयंत आसगावकर, श्री.नागरोराव गाणार, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात नंदुरबार व अमरावती जिल्ह्यात प्राथमिक व माध्यमिक शाळांच्या अनुक्रमे ३३ व ७ शिक्षकांचा कोरोनामुळे मृत्यू झाल्याचे माहे मे, २०२१ च्या पहिल्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शाळा बंद असतानाही बहुतांश जिल्हा शिक्षणाधिकारी यांच्या आदेशान्वये कोरोना नियंत्रणासाठी शिक्षकांना नियुक्त्या देण्यात आल्या असून आजमितीस राज्यातील सुमारे २१३ शिक्षकांचा कोरोनामुळे मृत्यू झाला परंतु सदरहू शिक्षकांना आणि त्यांच्या कुटुंबियांना कोरोना योद्धासाठी असणारे ५० लाखाचे विमा कवच (सानुग्रह अनुदान) न दिल्याने मृत्यू व बाधित शिक्षकांचे कुटुंबिय मदतीविना वंचित असल्याचे माहे जून, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे राज्यातील प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना कोरोना योध्दा म्हणून ५० लाखाचे विमा कवच, वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती व इतर आरोग्याच्या सेवासुविधा देवून त्यांच्या कुटुंबातील पत्नी, मुलगी किंवा मुलगा यापैकी एकाला अनुकंपा तत्वावर शासकीय सेवेत घेण्याबाबत आदी आशयांच्या मागणीचे एक निवेदन शिक्षण लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री महोदयांकडे सादर केले असून शिक्षक भारती आणि अन्य शिक्षक संघटनांनीही याबाबतची मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू मागणीनुसार राज्यातील प्राथमिक व माध्यमिक शाळांच्या शिक्षकांचा ५० लाखाचे विमा कवच देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१५-१२-२०२२) :** (१) ते (४) शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९/०५/२०२० रोजी नुसार कोविड विमा पॅकेज अंतिम होऊन कार्यान्वित होईपर्यंत अंतरिम उपाययोजना म्हणून कोविड विषयक कर्तव्य बजावताना कोविडमुळे मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना रुपये ५० लाखाचे सानुग्रह सहाय्य अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्यामधील अटी व शर्ती नुसार शिक्षण संचालनालयाकडून प्राप्त प्रस्तावाची पडताळणी करुन वित्त विभागाच्या मान्यतेनंतर मंजूर करण्यात येत आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात धुळे जिल्ह्यातील शिक्षक, शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना विमा कवच, सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत

**(१०) १०२३३ (०२-१०-२०२१) श्री.नागोराव गाणार, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात धुळे जिल्ह्यातील शिक्षकांचा कोरोनामुळे मृत्यू झाल्यास त्यांना विम्याचे कवच देण्याची मागणी शिक्षकांनी मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे केल्याचे माहे मे, २०२१ च्या पहिल्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच, सानुग्रह सहाय्य लागू करण्याचा निर्णय वित्त विभागाने मागील वर्षी दिला असून राज्यातील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी कोविड संदर्भात कर्तव्य पार पाडत असल्याने त्यांना ५० लाखाचे विमा कवच, सानुग्रह सहाय्य तात्काळ लागू करण्यात यावे असे शिक्षक संघटनांकडून शासनास निवेदन देण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, त्यानुसार शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे परिपूर्ण प्रस्ताव शिक्षण संचालनालय (प्राथ.) यांच्या मार्फत पाठविण्याचे कळविण्यात आले असून राज्यातील अनेक जिल्ह्यांतील शिक्षकांचा कोविड-१९ च्या प्रादुर्भावाने मृत्यू होऊनही केवळ नागपूर जिल्ह्यातून दोनच प्रस्ताव शासनाकडे पाठविण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सर्व जिल्ह्यांतील कोविड-१९ मुळे मृत्यू झालेल्या शिक्षकांच्या कुटुंबियांना मदत करण्यासाठीचे प्रस्ताव कधीपर्यंत पाठविण्यात येणार आहेत,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन करोनाबाधित शिक्षक व कुटुंबियांना तात्काळ मदत मिळण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (०९-१२-२०२२) :** (१) व (२) अशा आशयाची निवेदने प्राप्त होत आहेत.
(३) नाही.
(४) शिक्षण संचालनालय यांच्यामार्फत विविध जिल्ह्यातील प्रस्ताव प्राप्त होत आहेत.
(५) शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९/०५/२०२० रोजी नुसार कोविड विषयक कर्तव्य बजावताना कोविडमुळे मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना रुपये ५० लाखाचे सानुग्रह सहाय्य अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्यामधील अटी व शर्ती नुसार शिक्षण संचालनालयाकडून प्राप्त प्रस्तावाची पडताळणी करुन परिपूर्ण प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेनंतर मंजूर करण्यात येत आहेत.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात कोविड १९ साठी शिक्षकांच्या अधिग्रहित केलेल्या सेवेतून कार्यमुक्त करणेबाबत

**(११) १०९०४ (०६-०१-२०२२) श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात कोविड-१९ या संसर्गजन्य रोगामुळे अनेक शिक्षकांना चेक पोस्ट, कोविड रुग्णालयात सेवा, कोविड वॅक्सिन नोंदणी तसेच इतर बाबींसाठी शिक्षकांच्या सेवा अधिग्रहित केल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार शासनाने शाळा सुरू करण्याचा निर्णय घेतला असल्याने कोविड-१९ साठी ज्या शिक्षकांच्या सेवा अधिगृहीत केल्या आहेत त्या शिक्षकांना कार्यमुक्त करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) शिक्षकांच्या सेवा आपत्ती व्यवस्थापन कायद्यांतर्गत अधिग्रहित करण्यात आल्या असल्याने ते कर्तव्य पार पाडणे आवश्यक होते. सध्या परिस्थिती सर्वसामान्य झाली असल्याने सर्वांना कार्यमुक्त करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनेक गुणवंत शिक्षक राज्य शिक्षक पुरस्कारापासून वंचित असल्याबाबत

**(१२) ११००७ (०६-०१-२०२२) श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.राजेश राठोड, डॉ.वजाहत मिर्झा, डॉ.सुधीर तांबे, श्री.अभिजित वंजारी, श्री.जयंत आसगावकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अनेक गुणवंत शिक्षक हे राज्य शिक्षक पुरस्कारापासून मागील दोन वर्षापासून वंचित आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पुरस्कार विजेत्या शिक्षकांना द्यावयाच्या दोन वेतनवाढीच्या मुद्द्यांचा प्रस्ताव शासनाकडे प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन यासंदर्भात निर्णय घेऊन सदरील पुरस्कार तातडीने जाहीर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (३०-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) राज्य शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना दिनांक ०४ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये दोन वेतनवाढीऐवजी रुपये १ लाख इतकी ठोक रक्कम देण्यात येते.
(३) व (४) दिनांक २८ जून, २०२२ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे राज्य शिक्षक पुरस्काराचे निकष सुधारीत करण्यात आले असून सन २०२१-२२ चे पुरस्काराबाबतची कार्यवाही चालू आहे.

---

## राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भण्याबाबत

**(१३) ११९४२ (३०-०३-२०२२) श्री.विक्रम काळे, श्री.बाळाराम पाटील:** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शाळांमध्ये माहे डिसेंबर, २०२१ अखेर प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक अनुदानित व विनाअनुदानित शाळेतील शिक्षकांची व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची किती पदे रिक्त आहेत,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदहरू पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) राज्यातील प्राथमिक शाळेत यु-डायस डाटा. सन २०१९-२० नुसार सुमारे २२०४२ प्राथमिक शिक्षक पदे रिक्त आहेत.
(२) राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची रिक्त पदे भरण्यास वित्त विभागाची मान्यता घेण्याचे प्रस्तावित आहे. तसेच शिक्षक अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी २०२२ चे आयोजन आयबीपीएस कंपनीमार्फत घेण्याच्या सूचना शासन पत्र दिनांक ०७/११/२०२२ अन्वये दिल्या आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषदेतर्फे घेण्यात आलेल्या परिक्षांचे निकाल लावण्याबाबत

**(१४) १३५९४ (३०-०५-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषदेतर्फे टंकलेखन, संगणक टंकलेखन व लघुलेखन यांच्या स्पीड परीक्षा माहे नोव्हेंबर, २०२१ मध्ये घेण्यात आल्या होत्या, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सुमारे एक लक्ष नऊ हजार विद्यार्थ्यांनी दिलेल्या परिक्षेचा अद्यापही अंतिम निकाल जाहीर करण्यात आलेला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन परिक्षेचा निकाल जाहीर करण्याकरीता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२०-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) नोव्हेंबर, २०२१ मध्ये घेण्यात आलेल्या संगणक टंकलेखन परीक्षेचा निकाल दिनांक १५/०४/२०२२ रोजी ऑनलाईन जाहीर करण्यात आला आहे. तसेच टंकलेखन व लघुलेखन परीक्षेचा निकाल दिनांक २८/०३/२०२२ रोजी ऑनलाईन जाहीर करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## श्रीमती हेमलता मुनोत, सह.शिक्षिका, न्यु हिंदी हायस्कुल, मुंब्रा, ठाणे व इतर शिक्षक यांच्या पाल्यांना शिक्षक पाल्य नि:शुल्क सवलतीपासून वंचित रहावे लागल्याबाबत

**(१५) १३८६७ (२५-०८-२०२२) ॲड.निरंजन डावखरे, श्री.प्रविण दरेकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) श्रीमती हेमलता मुनोत, सह.शिक्षिका, न्यु हिंदी हायस्कुल, मुंब्रा, ठाणे व इतर शिक्षक यांच्या पाल्यांना उशीरा निकाल लागल्याने व उशीरा प्रवेश मिळाल्याने शिक्षक पाल्य नि:शुल्क सवलतीपासून वंचित रहावे लागल्याचे माहे मे, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शाळेचे निकाल व प्रवेश उशीरा लागल्याने तसेच त्या काळात शिक्षक नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्याने त्यांना या सवलतीच्या लाभापासून वंचित ठेवण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधान परिषद यांनी दिनांक ०५/०५/२०२२ रोजी शिक्षक पाल्यांना न्याय मिळण्याच्या अनुषंगाने शिक्षक पाल्य नि:शुल्क सवलत मिळण्याबाबत शासनाकडे विनंती केली परंतु राज्यातील हजारो शिक्षक कर्मचाऱ्यांचे पाल्य या नि:शुल्क योजनेपासून वंचित राहिले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई यांनी शिक्षण पाल्य नि:शुल्क सवलत मिळण्याबाबतच्या प्रस्तावाबाबत धोरणात्मक निर्णय घेण्याकरीता मा.शिक्षण संचालक (माध्य व उच्च माध्य), पुणे यांना दिनांक २७ मे, २०२२ रोजी पत्र देऊन विनंती केली आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१६-१२-२०२२) :** (१), (२), (३), (४) व (५) होय, हे अंशत: खरे आहे.

श्रीमती मुनोत या शासनसेवेमधून नियत वयोमानानुसार दिनांक ३१/०८/२०२० रोजी सेवानिवृत्त झाल्या आहेत. श्रीम. मुनोत त्यांच्या हे मुलाने दिनांक ०२/०२/२०२१ रोजी उच्च शिक्षणासाठी प्रवेश घेतला आहे.

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय दिनांक १९/०८/१९९५ मधील मुद्दा क्रमांक ५ पात्रतेसाठी अटीं यांमधील अट क्रमांक (६) नुसार श्रीम. मुनोत या शासनसेवेमधून सेवानिवृत्त झाल्या असल्याने सदर शासन निर्णयाचा लाभ त्यांच्या पाल्यांकरीता अनुज्ञेय ठरत नाही.याबाबत श्रीमती मुनोत यांना कळविण्यात आले.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील भंडारा जिल्ह्यात राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेत जमा रकमेचा व पावत्याचा हिशेब मिळत नसल्याबाबत

**(१६) १३८९० (२५-०८-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.नागोराव गाणार, श्री.प्रवीण दटके :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील भंडारा जिल्ह्यात मागील वर्षापासून शिक्षक व कर्मचाऱ्यांसाठी राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना (एनपीएस) लागु करण्यात आली असून सदरहू योजनेंतर्गत प्रत्येक कर्मचाऱ्याच्या एकूण वेतनाची १० टक्के रक्कम दर महिन्याला कपात केली जाते मात्र आतापर्यंत किती रक्कम कपात केली याचा हिशेब मिळत नसल्याने शिक्षकांमध्ये असंतोष निर्माण झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शिक्षक तथा कर्मचाऱ्यांच्या एकूण वेतनाच्या १० टक्के तर शासनाकडुन १४ टक्के रक्कम या योजनेत जमा करण्यात येते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, एनपीएस योजनेत कपात केलेल्या रकमेचा हिशेब व पावत्या मिळत नसल्याने नेमकी किती रक्कम जमा झाली याचा हिशेब लागत नसल्याने जुनी पेंशन योजना लागू करण्याबाबत शिक्षक संघटनाची मागणी असल्याने याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१४-१२-२०२२) :** (१) नाही.
राष्ट्रीय योजनेचे प्राण किट सर्व शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वाटप करण्यात आले असून त्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने तसेच मोबाईल ॲपद्वारे सदरचा संपूर्ण हिशोब पाहता येतो.
(२) होय.
नियमाप्रमाणे जमा करण्यात येतो.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत कार्यरत शिक्षकांच्या समायोजनाबाबत

**(१७) १४१८० (२५-०८-२०२२) डॉ.रणजित पाटील, श्री.नागोराव गाणार : तारांकित प्रश्न क्रमांक १२१४६ ला दिनांक २२ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासन पुरस्कृत राज्यात अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत कार्यरत १३५८ विशेष शिक्षकांच्या समायोजनाचा प्रस्ताव मा.शिक्षण संचालक (प्राथमिक) पुणे यांनी दिनांक २९ डिसेंबर, २०१८ रोजी शासनाकडे सादर केला होता, हे खरे आहे काय,
(२) तसेच मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांनी दिनांक २५/०८/२०१६ रोजी निर्णय देवून विशेष शिक्षकांचे समायोजन करण्याचे आदेश दिले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, त्यानुसार मा.तत्कालीन मुख्यमंत्री महोदयांनी उच्च न्यायालयाच्या आदेशाचे तात्काळ अनुपालन करावे असे निर्देश दिले होते, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार व मा.मुख्यमंत्री यांच्या निर्देशानुसार विशेष शिक्षकांच्या समायोजनाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२८-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य यांनी १३५८ विशेष शिक्षकांच्या प्रकरणी रद्द केलेल्या मान्यता, पुनर्स्थापित करण्याचे तसेच सदर शिक्षकांच्या उपस्थितीबाबतची कागदपत्रे तपासून त्यांना वेतन अदा करण्याचे आदेश मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांनी रिट याचिका क्र. १०३०/२०१६ प्रकरणी दिनांक २५/०८/२०१६ रोजी दिले आहेत.
(३) हे खरे आहे.
(४) सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्या अध्यक्षतेखालील चौकशी समितीच्या अहवालानुसार पुढील कार्यवाही सुरू आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी शहरातील अतिरिक्त पोलीस अधिक्षकांच्या निवासस्थानाची डागडुजी करण्याच्या निविदेच्या कामात अनियमितता झाल्याबाबत

**(१८) १४४८६ (२५-०८-२०२२) श्री.रमेश कराड, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी शहरातील अतिरिक्त पोलीस अधीक्षकांच्या निवासस्थानाची डागडुजी करण्यासाठी रुपये २७ लाख ६४ हजार ६७१ ची निविदा सार्वजनिक बांधकाम विभागाने काढली असल्याचे माहे जानेवारी, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर कामासाठी दिनांक १३ ते २७ जानेवारी, २०२२ या कालावधीत निविदा दाखल करावयाची असून त्यानंतर दिनांक २९ जानेवारी, २०२२ रोजी सकाळी ११ वाजता निविदा उघडण्यात येणार होती, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, निविदा उघडल्यानंतर प्रक्रियेअंती नियमानुसार प्रत्यक्ष कंत्राटदार ठरविण्यात येणार होता, असे असतानाही कंत्राटदाराकडून २० दिवसापुर्वीच निवासस्थान डागडुजी करण्याचे काम सुरु करण्यात येऊन अधिक कामे पूर्ण करण्यात आली असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे आहे,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया राबविण्याआधीच कामे करण्यात येत असल्याप्रकरणी सार्वजनिक बांधकाम विभागातील नियमांचा भंग करणाऱ्या दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रविंद्र चव्हाण (२०-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.

परभणी शहरातील अतिरिक्त पोलीस अधीक्षकांच्या निवासस्थानाची डागडूजी करण्याच्या कामासाठी दिनांक १९/०१/२०२२ रोजी निविदा मागविण्यात आल्या.
(२) हे खरे आहे.

निविदा सूचनेनुसार निविदा सादर करण्याचा कालावधी दिनांक १३/०१/२०२२ ते २७/०१/२०२२ असा होता व निविदा उघडण्याचा दिनांक २९/०१/२०२२ सकाळी ११ वा. असा होता.
(३) व (४) हे खरे नाही.

ई-निविदा प्रक्रियेंतर्गत एकूण ६ निविदाकारांनी ऑनलाईन निविदा सादर केल्या होत्या. त्यापैकी ३ पात्र निविदाकारांचा आर्थीक देकार लखोटा क्र.२ दिनांक ७/२/२०२२ रोजी उघडण्यात आला. त्यापैकी न्युनतम देकार असणाऱ्या निविदाधारकाची निविदा स्विकारुन कामास दिनांक ७/३/२०२२ रोजी कार्यारंभ आदेश देण्यात आला. सद्य:स्थितीत काम पूर्ण झाले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड परिमंडळाचे अधीक्षक अभियंत्यावर कारवाई करण्याबाबत

**(१९) १४८७७ (२५-०८-२०२२) श्री.रामराव पाटील, श्री.गोपिचंद पडळकर, श्री.सुरेश धस :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड परिमंडळाचे अधीक्षक अभियंता यांच्या जाचाला कंटाळून एका उप अभियंत्यांनी ३ वर्षे अगोदर स्वेच्छानिवृत्ती घेतली असल्याचे माहे जून, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त अधीक्षक अभियंत्यावर यापूर्वीही विविध गुन्हे दाखल आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर अधीक्षक अभियंत्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रविंद्र चव्हाण (२१-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात समग्र शिक्षण अभियानाचा निधी त्याच आर्थिक वर्षात खर्च करण्याबाबत

**(२०) १५०६० (०७-१०-२०२२) श्री.नागोराव गाणार, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामदास आंबटकर, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात समग्र शिक्षण अभियान ही महत्वाची योजना असून ती सर्व शिक्षा अभियान, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान तसेच शिक्षक शिक्षण या तीन योजना एकत्रित करुन राबविण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू योजनेसाठी सन २०१८-२०१९, २०१९-२०२०, २०२०-२०२१ या तीन वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या निधींपैकी सुमारे ५२.५ टक्के इतका निधी अखर्चित राहिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शिक्षणाला प्रेत्साहन देणाऱ्या अनेक योजना सुरु असल्या तरी समग्र शिक्षा अभियानाचा निधी वेळेत खर्च न करण्याची कारणे काय आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन समग्र शिक्षा अभियानाचा निधी त्याच आर्थिक वर्षात खर्च करण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (०४-०१-२०२३) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

सन २०१८-१९, २०१९-२० व २०२०-२१ या तीनही वर्षांत प्रत्यक्ष प्राप्त झालेला सर्व निधी समग्र शिक्षा योजनेसाठी वापरण्यात आलेला आहे.

(३), (४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेन्द्र भागवत**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.